सन २०१८ च्या खरीप हंगामात शासनाने दुष्काळ जाहीर केलेल्या भागात शेळी-मेंढी छावण्यांसाठी निधी वितरित करणेबाबत-**पुणे विभाग (माहे सप्टेंबर-ऑक्टोबर, २०१९).**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एससीवाय-०४/२०१९/प्र.क्र.२६/म-११**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: ९ जुलै, २०२०

वाचा-

**१) शासन निर्णय क्रमांकः एससीवाय-२०१९/प्र.क्र.३०/म-७, दि.२५ जानेवारी, २०१९.**

**२) शासन निर्णय क्रमांकः एससीवाय-२०१९/प्र.क्र.१७७/म-७, दि.३१ मे, २०१९.**

**३) शासन निर्णय क्रमांकः एससीवाय-०९/२०१९/प्र.क्र.६५/म-११, दि.२१ नोव्हेंबर, २०१९.**

**४)विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.पुशा/कार्या/१/आरआर/३६२/२०२०, दि.२१.५.२०२०.**

प्रस्तावना-

सन २०१८-१९ हंगामात राज्यातील दुष्काळी भागात जनावरांसाठी चारा छावण्या सुरु करण्यास संदर्भाधीन शासन निर्णय दि.२५.१.२०१९ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन शासन निर्णय दि.३१.५.२०१९ अन्वये राज्यातील पुणे, नाशिक व औरंगाबाद या ३ प्रशासकीय विभागामधील ८ जिल्ह्यासाठी (पुणे, सांगली, सातारा, सोलापूर, अहमदनगर, जळगाव, बीड व उस्मानाबाद) शेळ्या-मेंढ्यांसाठी छावण्या उघडण्यास मान्यता दिलेली आहे. तद्नुसार, विभागीय आयुक्त, पुणे यांना माहे-जून ते ऑगस्ट, २०१९ या तीन महिन्यांकरिता एकूण रक्कम रु.३०,००,८५८/- (अक्षरी रुपये तीस लाख आठशे अठ्ठावन्न फक्त) इतका निधी सातारा जिल्ह्याकरिता संदर्भाधीन शासन निर्णय दि.२१.११.२०१९ अन्वये वितरीत करण्यात आला होता. आता विभागीय आयुक्त, पुणे यांनी त्यांचेकडील संदर्भाधीन पत्रान्वये माहे सप्टेंबर-ऑक्टोबर, २०१९ या दोन महिन्यांची देयके अदा करण्यासाठी शासनाकडे निधीची मागणी केली आहे. त्यानुसार, अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सन २०१८-१९ च्या हंगामातील पुणे विभागामधील माहे सप्टेंबर-ऑक्टोबर, २०१९ करिता शेळ्या-मेंढ्यांच्या छावण्यांची देयके अदा करण्यासाठी विभागीय आयुक्त, पुणे यांनी मागणी केल्यानुसार

सातारा जिल्ह्याकरिता एकूण रक्कम रु.११,०७,७०० (अक्षरी रुपये अकरा लाख सात हजार सातशे फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सन २०२०-२१ या चालू वित्तीय वर्षामध्ये मागणी क्र.सी-६, मुख्य लेखाशीर्ष २२४५, नैसर्गिक आपत्ती निवारणार्थ सहाय्य, ०१, अवर्षण, १०१, अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०३) जनावरांच्या छावण्यांमध्ये चारा पाणी औषध यांचा पुरवठा आणि छावण्यांपर्यंत वाहतुकीचा खर्च (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) **(२२४५ ००७५)** या लेखाशीर्षाखाली पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून **एकूण रक्कम रु.११,०७,७००/- (अक्षरी रुपये अकरा लाख सात हजार सातशे फक्त)** इतका निधी बीम्स प्रणालीद्वारे **विभागीय आयुक्त, पुणे** यांना वितरीत करण्यात येत आहे. त्यांनी तो तात्काळ जिल्हाधिकारी, सातारा यांना वितरीत करावा.

३. सदर निधी मिळाल्यापासून शेळी-मेंढी चारा छावणी देयकांच्या अदायगीचे काम त्वरित पूर्ण करावे. शेळी-मेंढी चारा छावणीबाबत संदर्भीय शासन निर्णयामध्ये नमूद निकष, विविध अटी व शर्ती व त्यामधील सूचनांप्रमाणे कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

४. सदर वितरीत निधी हा स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) अथवा बँक खात्यात न ठेवता तो शेळी-मेंढी छावणी प्रायोजक संस्था यांना थेट Electronic Clearing Services द्वारे वितरित केला जाईल, या अटीच्या अधीन राहून निधी वितरणाची कार्यवाही करण्यात येत आहे. तरी त्यानुसार विभागीय आयुक्त, पुणे यांनी कार्यवाही करावी.

५. सदर निधीचे वाटप अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे विभागीय आयुक्त, पुणे यांना करण्यात येत आहे. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वितरित केला आहे, तो त्याच प्रयोजनासाठी वापरला जात आहे, याची खातरजमा विभागीय आयुक्त यांनी करावी. निधी वाटपाचे लेखे, अभिलेखे, नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत होणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात याव्यात. तसेच झालेल्या खर्चाचा कोषागार व महालेखापाल कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी **त्रैमासिक ताळमेळ घेऊन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र** या विभागाकडे तात्काळ सादर करण्यात यावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल, तर ती विहित वेळेत शासनास प्रत्यर्पित करावी.

६. नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत सचिव (मदत व पुनर्वसन) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात

येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण/उपशीर्षाच्या संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रक अधिकाऱ्यांनी द्यावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०९१७४८१५२६१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(राजश्री राऊत)
वित्तीय सल्लागार व सहसचिव

प्रत,

१. मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.सचिव, मदत व पुनर्वसन प्रभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. विभागीय आयुक्त, पुणे.
५. जिल्हाधिकारी, सातारा.
६. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य.
७. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
८. महालेखापाल १ व २ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर (३ प्रती).
९. वित्त विभाग (अर्थसंकल्प-६/व्यय-९/अर्थोपाय कक्ष/वित्त आयोग कक्ष), मंत्रालय, मुंबई-३२.
१०. कार्यासन अधिकारी (म-७), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवडनस्ती (कार्यासन: म-११).